श्री क्षेत्र नारायणगड, ता.जि.बीड या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखडयांस सुधारित प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: तीर्थवि-२०२४/प्र.क्र.२६/यो-११**

**बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ**

**फोर्ट, मुंबई ४०० ००१**

**दिनांक : १५ मार्च,२०२४**

वाचा:-

१) जिल्हाधिकारी, बीड यांचे पत्र क्रमांकः जिनिस/क्र.१६८/पर्यटन-तिर्थक्षेत्र/२०१७-१८, दिनांक २३.०५.२०१७ अन्वये सादर केलेला प्रस्ताव.

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक: तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/१४४४,दि.४ जून २०१५.

३) मा.मुख्यसचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि. ०७.१०.२०१७ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

४) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय समितीचे दि.९ जानेवारी,२०१८ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

५) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१७/प्र.क्र.१७३/यो-६, दि. १४ फेब्रु,२०१८.

६) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०२१/प्र.क्र.१५७ (भाग-१) /यो-६, दि.०१.१२.२०२२.

७) ) जिल्हाधिकारी, बीड यांचे पत्र जा.क्र.जिनिसबी/नियोजन/तीर्थक्षेत्र/२०२३-२४/३४२३ दि.०८.०६.२०२३.

८) जिल्हाधिकारी, बीड यांचे पत्र जा.क्र.जिनिसबी/नियोजन/तीर्थक्षेत्र/२०२३-२४/२०० दि.१७.०१.२०२४.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.०५ अन्वये **श्री क्षेत्र नारायणगड, ता.जि.बीड** या तीर्थक्षेत्राच्या रु.२५,००,००,०००/- (रुपये पंचवीस कोटी फक्त) इतक्या रकमेच्या विकास आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येऊन संदर्भाधीन शासन निर्णय क्र.०६ अन्वये रु.२,५०,००,०००/- (रुपये दोन कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, बीड यांना वितरीत करण्यात आला होता.

जिल्हाधिकारी, बीड यांच्या संदर्भीय पत्र क्र.७ अन्वये प्रशासकीय मान्यता प्राप्त आराखड्यातील एकूण १७ कामापैंकी भक्त निवासाचे काम अंतिम टप्प्यात असून वितरीत केलेला रु.२.५० कोटी निधी खर्च केला आहे. उर्वरित रु.२२.०० कोटीची १६ कामे अद्याप पूर्ण झालेली नाहीत. त्यामुळे संदर्भीय पत्र क्र.८ नुसार मा. पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीची मान्यता घेऊन आराखड्यातील काही मंजूर कामे वगळून इतर मंजूर कामांच्या मंजूर रक्कमेत वाढ करून रु.२५.००कोटीच्या मर्यादेत सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार सदर तीर्थक्षेत्रासाठी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

**"जिल्हाधिकारी, बीड यांनी सादर केलेल्या श्री क्षेत्र नारायणगड, ता.जि.बीड या तीर्थक्षेत्रास यापूर्वी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या विकास आराखड्याच्या किंमतीच्या मर्यादेत, सुधारित प्रशासकीय मान्यता देऊन , आराखड्यांतर्गत कामांकरिता मंजूर निधीच्या अंतर्गत समायोजन करून आता आराखडयातील कामे पूर्ण करण्यासाठी एकूण रू.२४,५९,६०,०००/- ( रु .चोवीस कोटी एकोणसाठ लक्ष साठ हजार फक्त) इतक्या निधीच्या खालील विकास कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे."** तपशिलवार विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे.

(रू. कोटी)

| अ क्र | कामाचे नाव | प्ररक्कम.मा. | प्रत्यक्ष खर्च | सु .मा.प्र. रक्कम | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १. | अ) मंदिर परिसरात दगडी फरशी बांधकाम<br>ब) वेस (प्रवेशद्वार) सुंदर असे वास्तुशिल्प- चारही दिशांना<br>क) लैंडस्केप | ३.०० | - | **६.१७** | **प्रस्तावित सु.प्र.मा.** |
| २. | सार्वजनिक शौचालय<br>अ) पुरुषांसाठी (२५क्षमता)<br>ब) स्त्रियांसाठी (२५ क्षमता) | ०.८० | - | **०.९६६०** | **प्रस्तावित सु.प्र.मा.** |
| ३. | पाणी व जलव्यवस्थापन<br>अ) पाण्याची टाकी<br>ब) पाईपलाईन व उपांग दुरूस्तीची कामे<br>क) जलसंवर्धन कामे | ३.४५ | - | **५.००** | **प्रस्तावित सु.प्र.मा.** |
| ४. | वाहनतळ<br>अ) सिमेंट कॉक्रीट- वाहनतळ<br>ब) बस स्टैंड | १.५० | - | **३.३३** | **प्रस्तावित सु.प्र.मा.** |
| ५. | विद्युतीकरण<br>अ) तीन ट्रान्सफॉर्मर (१००KVA)<br>एक स्वतंत्र बे,<br>६.०० किमी L.T. Line:<br>२.७० किमी H.T. Line.<br>ब) अंतर्गत व बाह्य सौर पथदिवे उभारणी व भक्त निवास सोलार वॉटर हिटर | ०.६६४८<br>३३०. | - | - | काम वगळले |
| ६. | भक्त निवास<br>अ) भक्त निवास (१००० व्यक्ती)<br>ब) चार कक्षांचे विश्रामगृह<br>क) गरम व थंड पाणी व्यवस्था (RO Filter सहीत) | ३.०० | २. ५० | **३.००** | भक्तनिवास इमारतीचे ९०% बांधकाम काम पूर्ण. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ७. | सांस्कृतिक सभागृह (२५००० क्षमता) | ३.०० | - | - | काम वगळले |
| ८. | दोन प्रसादालय (२००० क्षमता प्रत्येकी) | २.०० | - | **५.०२** | **प्रस्तावित सु.प्र.मा** |
| ९. | गोशाळा (१००० पशू) | १.०० | - | - | काम वगळले |
| १०. | मंदिरातील गाभा यांचे-Live video दर्शनासाठी LED Screen बसविणे | ०.५० | - | - | **काम वगळले** |
| ११. | Public address systern व CCTV speaker | ०.५० | - | - | काम वगळले |
| १२. | पोलीस मदत केंद्र (महिला व पुरूष स्वतंत्र) | ०.३० | - | - | काम वगळले |
| १३. | अ) सामानाकरिता डिजिटल लॉकर<br>ब) चप्पल स्टँड | ०.२० | - | - | काम वगळले |
| १४. | पाय धुवून मंदिरात जाता येईल अशी व्यवस्था | ०.१५ | - | - | काम वगळले |
| १५. | दिशादर्शक माहिती फलक | ०.०५ | - | - | काम वगळले |
| १६. | रेस्टॉरंट, विक्री केंद्रे व वस्तू संग्रहालये | १.५० | - | - | काम वगळले |
| १७. | घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन | ०.१६ | - | **१.११** | **प्रस्तावित सु.प्र.मा** |
| | **एकूण रक्कम रु.** | **२५.००** | **२.५०** | **२४.५९६०** | |

**०२. ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेंतर्गत राज्यातील ग्रामीण तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत करण्यासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात एकूण रु.२४०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर तरतुदीतून उपलब्ध निधीच्या मर्यादेत श्री क्षेत्र नारायणगड, ता.जि.बीड या तीर्थक्षेत्रातील विकास कामांसाठी वरील कामांच्या प्रशासकीय मान्यतेच्या रकमेच्या २०% म्हणजेच ४ कोटी ९१ लक्ष इतका निधी जिल्हाधिकारी, बीड यांना वितरीत करण्यात येत आहे."**

०३. जिल्हाधिकारी, बीड यांनी प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामावरच सदर निधी खर्च करावा. तसेच सुधारित प्रशासकीय मान्यतेमधिल मधील मंजूर कामे पूर्ण करण्याकरिता शासन उक्त निधी वितरीत करीत आहे. सबब, सदर निधी संबधित कार्यान्वियिन यंत्रणेला वितरीत करताना व प्रत्यक्ष खर्च करताना तसेच सदर कामे पूर्ण करताना उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र.५ मध्ये नमूद अटी-शर्ती व त्यामध्ये दिलेले संबंधित निदेश व प्रचलित नियम लागू राहतील.

०४. सदर कामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्यांची तांत्रिक मंजूरी असल्याची व बांधकामासाठी आवश्यक जागा ग्रामपंचायत/जिल्हा परिषद मालकीची आहे, याची जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीने खात्री करून पुढील कार्यवाही करावी.

०५. मंजूर निधीचा योग्य विनियोग होण्यासाठी व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही या दृष्टीने जिल्हाधिकारी, बीड यांनी दक्षता घ्यावी. सदर कामांचा त्यांनी वेळोवेळी आढावा घेऊन कामावर देखरेख ठेवावी व कामांचा भौतिक प्रगती अहवाल व खर्चाची माहिती विहित मुदतीत सादर करावी. तसेच, जिल्हाधिकारी, बीड यांनी या योजनेकरिता झालेल्या/होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाचा ताळमेळ घेऊन त्यामध्ये तफावत राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी व सदर निधी आवश्यक बाबींवर खर्च झाला असल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

०६. राज्य शासनामार्फत वेळावेळी प्रस्तुत योजनेविषयी व वित्त विषयक वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले आदेश/नियम/शासननिर्णय/वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करून वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०७. सदर कामांचे नियोजन व खर्चाचे सनियंत्रण, नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दिनांक ४ जून,२०१५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय कार्यकारी समितीकडे सोपविण्यात येत आहे. समितीची कार्यकक्षा शासन निर्णयात नमूद केल्यानुसार राहिल.

०८. निधीकरिता जिल्हा नियोजन अधिकारी/ सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, बीड यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हाधिकारी, बीड यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०९. या विभागाच्या शासन निर्णय दि.१६/११/२०१२ नुसार पशूहत्त्या व अंधश्रद्धा वाढीला प्रोत्साहन देणाऱ्या तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत केला जाणार नाही, अशी स्पष्ट तरतूद आहे. त्यामुळे या तीर्थक्षेत्रस्थानी असे प्रकार होणार नाही याची दक्षता संबंधितांनी घ्यावी व असे प्रकार झाल्याचे शासनाच्या निदर्शनास आल्यास योग्य ती कार्यवाही केली जाईल व शासकीय अनुदान थांबविले जाईल.

१०. जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने कामांच्या अंमलबजावणीसाठी संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणांशी समन्वय साधावा व कामे विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात.

११. उपरोक्त कामांवरील खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६, जिल्हापरिषदांना / जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय्य-(००)(०७) ग्रामीण भागातील तीर्थक्षेत्रांच्या विकासाकरीता रु.२.०० ते २५.०० कोटीपर्यंत अनुदान (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

१२. सदर निधी नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.८२/१४४४ दि.१६/०२/२०२४ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.१८०/२०२४/व्यय-१५ दि.२३/०२/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार वितरीत करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३ अन्वये अटीची व शर्तीची पूर्तता करून निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२००२२७०३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.03.15 20:40:38 +05'30'

**( का.गो.वळवी )**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, उप मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, छ.संभाजीनगर.
१४. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, बीड.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड .
१६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद , बीड.
१७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, बीड.
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
१९. नियोजन विभाग (का.१४७४/१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
२०. वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई ३२.
२१. कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्रामविकास विभाग.
२२. निवड नस्ती (का.यो-११). ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.